**श्री गणेशाय नमः**

# ✷ वटपोर्णिमा ✷

वास्तविक हे व्रत तीन दिवसाचे आहे. तीन दिवस करणे होत नाही म्हणून स्त्रिया एक दिवस हे व्रत करतात. जेष्ट शुद्ध पौर्णिमेस हे व्रत करावयाचे असते या व्रताकरिता चतुर्दर्शी युक्त पोर्णिमा घ्यावी चतुर्दशीस सूर्यास्तापूर्वी तीन मुहूर्त (सुमारे १ तास ३६ मिनिटे ) पोर्णिमा सुरु होत आहे तसे नसेल तर दुसर्या दिवशी हे व्रत करावे याप्रमाणे चतुर्दर्शी पोर्णिमा आली तर ती दुपारी केव्हातरी सुरु होते व पौर्णिमा सुरु झाल्याशिवाय पूजा कशी करावी अशी शंका येते काही स्त्रिया तर पोर्णिमा सुरु झाल्यानतर (दुपारी 2 नंतरही )पुजा करतात तसे करणे योग्य नाही सूर्योदयापासून मध्यान्पर्यंत हाच पूजाकाल म्हणून सांगितला असल्याने त्याकाळी पोर्णिमा नसली तरी पूजन करणे सशास्त्र आहे म्हणून अशावेळी पोर्णिमा सुरु होण्याची वाट न पाहता सकाळी वट पूजन करावे

**ब्रह्माणसहसावित्र्या सावित्री सत्यव्रत प्रीयाम |**
**धर्मराज मुनिद्रमच ध्यायामिच महातरूम |**
**वटमुले ब्रह्मासावित्र्ये नमः/**

या नाममात्राने षोडशोपचारे पूजन करावे हाच. पती जन्मोजन्मी मिळावा म्हणून हे व्रत करावयाचे अशी समजूत आहे पण ती चुकीची आहे प्रपंच्यात आवश्यक असणारे सौभाग्य, मुले, नातवंडे, धनधान्य, आरोग्य हे प्राप्त व्हावे हा या व्रताचा हेतू आहे. सुहासिनी स्त्रियांनी दिवसभर उपवास करावा. सकाळी वटवृक्षचे पूजन करावे. वटमुलाचे ठिकाण ब्रम्हा सावित्री यांचा वास असतो म्हणून वटमुलाचे पूजन करण्यास सांगितले आहे व्रतवैकल्ये करण्याने संयम निर्माण होतो

## यावर्षी वटपोर्णिमा

या वर्षी ज्येष्ट शुद्ध पौर्णिमा गुरुवारी सकाळी १०.२३ पर्यंत आहे तथापि वटपोर्णिमा मात्र शु .१४ ल बुधवारी दिलेली आहे सूर्यास्तापूर्वी ६ घाटीपेक्षा अधिक व्यापिनी अशा चतुर्दर्शी युक्त असलेल्या पौर्णिमेच्या दिवशी सावित्रीव्रत (वटपूजन ) करावे असे वचन आहे. दि 27 जून बुधवारी जेष्ठ शु १४ सकाळी ८.१३ पर्यंत असल्याने याच दिवशी पौर्णिमा तिथी सायंकाळी ६ घटी पेक्षा अधिक आहे म्हणून दि 27 जून रोजी वटपोर्णिमा दिलेली आहे वटपोर्णिमा दिलेली दिवशी सकाळी जरी चतुर्दशी तिथी असली तरीही

सुर्योदायानतर  मध्यान पर्यंत  म्हणजे दुपारी सुमारे सव्वा एक वाजेपर्यंत वटपुजन करावे तेव्हा शास्त्र वचनानुसार ज्येष्ट शुद्ध १४ ल बुधवारी दि. 27 जून रोजी नेहमीप्रमाणे उपवास सह वट पूजन करावे

कसे करावे  वट वृक्ष पूजन ?

वटसावित्री स्त्रियांनी करावयाच्या पुजेची पद्धत सामन्यात सारखी आहे .तथापि प्रत्येक पूजेत थोडे निराळेपण आहे  मंगलागौरी व हरितालिका या पूजेत अंग्पुजेनतर पत्रीपूजा असते मंगलागौरी पूजेत अभिषेकनतर देवी चौरंगावर ठेवतान कणकेची लेणी वाहतात वटपौर्णिमेची पुजा सुरु करणे पूर्वी वडाचे झाडास दोरा गुडाळण्याची पद्धत आहे ती वस्त्राकर्ता म्हणून असावी  स्त्रियांनी करावयाच्या पूजेचा सर्वसामान्य संकल्प देशकाल कथन करून

**सकल पुरानोक्त फल प्रात्यर्थ मम इह जन्मनि अखंड सौभाग्य पुत्रपौत्र धनधान्य आयुरारोग्य ऐश्वर्याभिवृद्धयर्थ श्रीवटमुले ब्रम्हासावित्री प्रीत्यर्थ  यथाज्ञानेन यथा मिलितोपचारद्रव्यै: ध्यानावाहनादी पूजन मह  करिष्ये. आदोनिर्विघ्नता सिद्धयर्थ महागणपती पूजनम कलशपूजन करिष्ये**

असा संकल्प करावा गणपती व कलश पूजेनंतर

**अपवित्र: पवित्रोवा सर्वावस्थांगगतोपिवा |**
**यस्मरेत्पुंडरीकाक्ष स बाह्याभ्यतर: शुची: ||**

असे म्हणून फुलांनी पूजा साहित्यावर व आपल्या अंगावर पाण्याने प्रोक्षण करावे यानंतर देवाचे ध्यान करावयाचे असते. हा ध्यानमंत्र देवतेनुसार वेगवेगळा असतो.

येथे सर्वपूजा विधी देणे अशक्य असलेले व देवपूजेची लहान लहान पुस्तके प्रसिध्य असून ती उपलब्ध आहेत म्हणून त्याचा उपयोग करून सर्व पूजा करावी.

हाच पती सात जन्म मिळावा म्हणून वट सावित्रीचे व्रत करवयाचे असते अशी अनेकांची समजूत आहे मग नवरा वाईट असला व्यसनी असला आळशी वेगरे दुर्गुणी असला तरी हाच नवरा सातजन्म मिळावा अशी मागणी करणे व त्याकरिता व्रत करणे योग्य आहे का? असा विचार करून वृत्तपत्रात रेडीओ वर बरीच टीका केली जाते पण हाच पती सातजन्म मिळावा म्हणून हे वट पूजन करावे असा उलेख कोठेही नाही व कोणी सांगितलेले नाही कर्माचा हेतू संकल्पात प्रकट होत असतो वर  दिलेल्या संकल्पात अश्या हेतूचा उलेख नाही

असे असता तसा हेतू असल्याचे गृहीत धरून टीका करणे म्हणजे श्रद्धेने वट पूजा करणार्या स्त्रीयाचा बुद्धिभेद करून अंधश्रद्धा निर्माण करणे होय आपल्या व्रत वेक्ल्ययांचा हेतू काय आहे हे जाणून ण घेता उगीच टीका व निदा करणे योग्य आहे का  याचा विचार न करता टीका करणे योग्य नाही व्रत वेक्ल्यांचा हेतू मानवी जीवनात संयम निर्माण होणे व इह परत्र उनती होणे हा आहे म्हणून असल्या टीकेला व निदेला ण जुमानता सर्व व्रत वैकले करणे स्त्री जीवनाचे दृष्टीने इष्ट व कल्याण करणारे आहे.

**वट प्रदक्षिणा**

वट प्रदक्षिणा सूत्र वेष्टन च व्रतदिनी सकाळी वट वृक्षास्थनी जाऊन व वट वृक्षास थोडे पाणी घालून गंध अक्षता फुले हळदीकुंकू  वाहावे नंतर सूत्र हाती धरून वट वृक्षास किमान तीन शक्य झाल्यास अकरा किवा सोळा प्रदक्षिणा कराव्यात त्यावेळी खालील प्रदक्षिणा मंत्र म्हणावे.

**वटमुले स्थितः ब्रम्हा वट मध्ये जनार्दन: | वटाग्रे तू शिवो देव :सावित्री वट ससंश्रीता ||१ ||**
**वट सिच्यामि ते मुलं सलीलैरमृतोपमै: | सूत्रेण वेष्टये भक्त्या गंध पुष्पाक्षतै: शुभै:    ||२||**
**नमो वटाय सावित्र्यै कुर्वाचेयं प्रदक्षीनाम | सावित्री च वट सम्यभिमंन्त्र्यै: प्रपुजयेत   ||३||**

**||शुभं भवतु ||**

**श्री . अमर प्रकाश स्वामी. (ज्योतिष शास्त्री) कबनूर**

**९७ ६४ ७१ २३ ८४**